राज्यातील कृषिपंप ग्राहकांना मुख्यमंत्री बळीराजा मोफत वीज योजना/वीज दर सवलत दिल्यामुळे महाराष्ट्र राज्य विद्युत वितरण कंपनी मर्यादित यांना रु.१८००.०० कोटी निधी रोखीने वितरित करण्याबाबत सन २०२४-२५ (लेखाशिर्ष -२८०१५५७२)

महाराष्ट्र शासन
ऊद्योग, ऊर्जा,कामगार व खनिकर्म विभाग,
शासन निर्णय क्र.निधीवी-२०२५/प्र.क.११/ऊर्जा-३
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक
मंत्रालय, मुंबई - ४०००३२.
दिनांक :- २८ मार्च, २०२५

**संदर्भ** :-

१) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्रमांक क्र.अर्थसं-२०२४/प्र.क्र.३४/अर्थ-३,दि.०१/०४/२०२४.
२) उद्योग, ऊर्जा,कामगार व खनिकर्म विभाग, शासन निर्णय क्र.निधीवी-२०२४/प्र.क्र.५५/ऊर्जा-३,दि.१८/०६/२०२४.
३) उद्योग, ऊर्जा,कामगार व खनिकर्म विभाग, शासन निर्णय क्र.संकीर्ण-२०२४/प्र.क्र.९७/ऊर्जा-५,दि.२५/०७/२०२४.
४) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्रमांक क्र.अर्थसं-२०२४/प्र.क्र.८०/अर्थ-३,दि.२५/०७/२०२४.
५) उद्योग, ऊर्जा,कामगार व खनिकर्म विभाग, शासन निर्णय क्र.निधीवी-२०२४/प्र.क्र.७८/ऊर्जा-३,दि.०३/०९/२०२४.
६) महावितरण कंपनीचे पत्र क्र.मु. अ.(वा)/शासन/मागणी/सवलत(GEN)/०३४३७५,दि.३०/१०/२०२४.
७) उद्योग, ऊर्जा,कामगार व खनिकर्म विभाग, शासन निर्णय क्र.निधीवी-२०२४/प्र.क्र.५५/ऊर्जा-३,दि.२७/११/२०२४.
८) उद्योग,ऊर्जा,कामगार व खनिकर्म विभाग शासन निर्णय क्र. संकीर्ण-२०२४/प्र.क्र.९४/ऊर्जा-३, दि.१३/१२/२०२४.
९) उद्योग, ऊर्जा,कामगार व खनिकर्म विभाग, शासन निर्णय क्र.निधीवी-२०२४/प्र.क्र.५५/ऊर्जा-३,दि.०३/०१/२०२५.
१०) उद्योग, ऊर्जा,कामगार व खनिकर्म विभाग, शासन निर्णय क्र.निधीवी-२०२४/प्र.क्र.५५/ऊर्जा-३,दि.०३/०१/२०२५.
११) उद्योग, ऊर्जा,कामगार व खनिकर्म विभाग, शासन निर्णय क्र.निधीवी-२०२४/प्र.क्र.१३७/ऊर्जा-३,दि.२५/०२/२०२५.
१२) उद्योग, ऊर्जा,कामगार व खनिकर्म विभाग, शासन निर्णय क्र.निधीवी-२०२४/प्र.क्र.११/ऊर्जा-३,दि.२७/०३/२०२५.

**प्रस्तावना** :-

राज्यातील विविध वर्गातील ग्राहकांना शासनाच्या धोरणानुसार वीज वितरण कंपनीला वीज दरात सवलत देण्यात येते व त्याची प्रतिपूर्ती शासनाकडून वीज वितरण कंपनीस केली जाते. मुख्यमंत्री बळीराजा मोफत वीज योजना/वीज दर सवलत योजनेतंर्गत संदर्भीय शासन निर्णय क्र. ३ अन्वये राज्यातील ७.५ एचपी पर्यंतच्या कृषिपंप ग्राहकांना पाच वर्षासाठी एप्रिल,२०२४ ते मार्च २०२९ पर्यंत मोफत वीज देण्यात येणार असून त्यासाठी प्रतिवर्षी लागणारा निधी अनुदान स्वरूपात महावितरण कंपनीस अदा करण्यात येत आहे. सन २०२४-२५ या आर्थिक वर्षाकरिता कृषिपंप ग्राहकांना मुख्यमंत्री बळीराजा मोफत वीज योजना/वीज दर सवलत योजनेकरिता लेखाशिर्ष २८०१५५७२ खाली मुळ रु.५६८५.०० कोटी व पुरवणी मागणी रु.७३००.०० कोटी असे एकूण रु.१२९८५.०० कोटी सुधारित तरतूद करण्यात आली आहे.

२. सदर तरतूदीपैकी वित्त विभागाच्या मान्यतेनुसार संदर्भिय शासन निर्णय क्र. २,५,७,९,१०,११ व १२ अन्वये रु. १११८५.०० कोटी इतका निधी महावितरण कंपनीस समायोजनाने व रोखीने वितरित करण्यात आला असून,आता वित्त विभागाच्या संदर्भिय शासन परिपत्रक क्र. ०४ मधील सुचनांच्या अनुषंगाने व वित्त विभागाने अनुमती दिल्यानुसार मुख्यमंत्री बळीराजा मोफत वीज योजना/कृषिपंप ग्राहकांना वीज दर सवलत योजनेकरिता सन २०२४-२५ मधील मार्च,२०२५ च्या अधिवेशनात पुरवणी मागणीद्वारे तरतूद करण्यात आलेली **रु.१८००.०० कोटी** निधी महावितरण कंपनीला रोखीने वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय</u>** :-

कृषिपंप ग्राहकांना मुख्यमंत्री बळीराजा मोफत वीज योजना/वीज दर सवलतीसाठी योजनेकरिता सन २०२४-२५ मधील मार्च,२०२५ च्या अधिवेशनात पुरवणी मागणीद्वारे तरतूद करण्यात आलेली **रु.१८००,००,००,०००/- ( रुपये एक हजार आठशे कोटी फक्त)** रक्कम महाराष्ट्र राज्य विद्युत वितरण कंपनी मर्यादित यांना रोखीने वितरीत करण्यास या शासन निर्णयाद्वारे मंजूरी देण्यात येत आहे.

२. सदर शासन निर्णयान्वये मंजूर करण्यात आलेल्या अर्थसहाय्याची रक्कम फक्त कृषिपंप ग्राहकांना मुख्यमंत्री बळीराजा मोफत वीज योजना/ वीज दर सवलत सवलतीपोटी खर्च होईल याची दक्षता विभाग स्तरावर ऊर्जा-५ कार्यासनाने तसेच महावितरण कंपनीने घ्यावी.तसेच ज्या उद्देशासाठी सदर निधी मंजूर करण्यात आला आहे, त्याच उद्देशासाठी तो उपयोगात आणला जाईल याची जबाबदारी महावितरण कंपनीची राहील.

३. उक्त प्रयोजनासाठी होणारा खर्च “मागणी क्रमांक के-६, २८०१ वीज, ०५ पारेषण व वितरण, १०४, वीज विकास व्यवस्था राष्ट्रीय भार, (०१) वीज दरात सवलत, (०१) (०१) कृषीपंप ग्राहकांना वीजदर सवलत (सर्वसाधारण) (२८०१५५७२), (कार्यक्रम) ३३ अर्थसहाय्य” या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकावा व तो सन २०२४-२५ या वित्तीय वर्षासाठी मंजूर असलेल्या तरतूदीमधून भागविण्यात यावा.

४. सदर रक्कम अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई यांच्यामार्फत कोषागारातून काढून महाराष्ट्र राज्य विद्युत वितरण कंपनी मर्यादित,मुंबई यांना अदा करण्यासाठी आहरण व संवितरण अधिकारी म्हणून श्रीमती अंकिता बो-हाडे, कार्यासन अधिकारी (ऊर्जा-३) आणि नियंत्रण अधिकारी म्हणून श्री. ना. श्री. कराड, सह सचिव (ऊर्जा-३),उद्योग,ऊर्जा व कामगार विभाग,मंत्रालय,मुंबई यांना प्राधिकृत करण्यात येत आहे. त्यांनी सदर मंजूर झालेली रक्कम **रु.१८००,००,००,०००/- ( रुपये एक हजार आठशे कोटी फक्त)** अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई येथून आहरित करुन महाराष्ट्र राज्य विद्युत वितरण कंपनी मर्यादित यांचे नावे स्वतंत्रीत्या धनादेश काढून वितरित अथवा NEFT/RTGS Fund Transfer द्वारे निधी हस्तांतरित करण्याची कार्यवाही करावी.

५. सदर योजनेला उद्योग, ऊर्जा, कामगार व खनिकर्म विभाग, शासन निर्णय क्र. संकीर्ण-२०२४/प्र.क्र.९४/ ऊर्जा-३,दि.१३/१२/२०२४ नुसार“आभासी वैयक्तिक ठेव लेखा” (VPDA) ही व्यवस्था व कार्यपध्दती लागू करण्यास सूट देण्यात आली आहे.

६. वित्त विभागाच्या संदर्भाधिन दि.०१/०४/२०२४, व दि.२५/०७/२०२४ रोजीच्या परिपत्रकातील सोबतच्या परिशिष्टातील अटीची पूर्तता होत असल्याचे प्रमाणित करण्यात येत आहे.

७. या लेखाशिर्षाखाली निधी वितरित करण्यासाठी सादर करण्यात आलेल्या देयकाच्या अनुषंगाने प्रमाणित करण्यात येते की, या लेखाशिर्षाखाली कोणतेही संक्षिप्त देयक प्रलंबित नाही तसेच उपयोगिता प्रमाणपत्र प्रलंबित नाही. सदर देयक हे सर्शत असून, वित्त विभागाच्या अनौपचारिक क्र.८९/२०२५/व्यय-१६,दि.२६/०३/२०२५ अन्वये प्राप्त मान्यतेनुसार सदर निधी रोखीने वितरित करण्यात येत आहे.

८. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.inया संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक क्र. २०२५०३२८११३९१२०९१० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

NARAYAN SHRIKRISHNA KARAD

Digitally signed by NARAYAN SHRIKRISHNA KARAD
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=INDUSTRIES ENERGY LABOUR AND MINING DEPARTMENT,
2.5.4.20=fc35aa8ffade5bb6105200693c60a32b755f7e67f72965b8dd57adaa570981f1,
postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=AE7FAEABAF4571C2748E4DD5FFD2CD108DE0E130859970F4D7D0EE40046B3E9E, cn=NARAYAN SHRIKRISHNA KARAD
Date: 2025.03.28 11:40:02 +05'30'

**(ना. श्री. कराड)**

**सह सचिव,महाराष्ट्र शासन**

**प्रत:-**

१) मा.राज्यपाल यांचे प्रधान सचिव,राजभवन,मलबार हिल,मुंबई.

२) मा. अध्यक्ष/उपाध्यक्ष विधानसभा,सभापती/उपसभापती विधानपरिषद,यांचे सचिव.
३) मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव मंत्रालय, मुंबई-३२.
४) मा. उपमुख्यमंत्री (नगरविकास व गृहनिर्माण) ,यांचे प्रधान सचिव मंत्रालय, मुंबई-३२.
५) मा. उपमुख्यमंत्री (वित्त व नियोजन), यांचे प्रधान सचिव मंत्रालय, मुंबई-३२.
६) मा. मंत्री अपारंपारिक ऊर्जा,यांचे खाजगी सचिव मंत्रालय,मुंबई-३२.
७) मा. राज्यमंत्री ऊर्जा, यांचे खाजगी सचिव मंत्रालय, मुंबई-३२.
८) सर्व मा. मंत्री/राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव मंत्रालय, मुंबई-३२.
९) मा. विरोधी पक्षनेता, विधान परिषद, विधानमंडळ सचिवालय, विधानभवन, मुंबई-३२.
१०) सर्व विधानसभा/विधानसभा सदस्य.
११) मा. मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
१२) अपर मुख्य सचिव (वित्त) मंत्रालय, मुंबई-३२.
१३) अपर मुख्य सचिव (नियोजन ) मंत्रालय, मुंबई-३२.
१४) अपर मुख्य सचिव (ऊर्जा ) उद्योग,ऊर्जा,कामगार व खनिकर्म विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
१५) अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/ सचिव, सर्व मंत्रालयीन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
१६) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य विद्युत मंडळ सुत्रधारी कंपनी, फोर्ट, मुंबई.
१७) अध्यक्ष तथा व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य वीज वितरण कंपनी, प्रकाशगड, बांद्रा (पूर्व), मुंबई-५१.
१८) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, मुंबई-४०००२०.
१९) महालेखापाल (लेखा व परिक्षा),महाराष्ट्र-१, मुंबई-४०००२०.
२०) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-२, नागपूर.
२१) अधिदान व लेखा अधिकारी (अराप/रालेवि-१), मुंबई.
२२) अधिदान व लेखा अधिकारी,अधिदान व लेखा कार्यालय, मुंबई.
२३) सह सचिव,(अर्थसंकल्प/व्यय-१६), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
२४) निवड नस्ती (ऊर्जा-३), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.